**श्री.गजानन यशवंत केदार (रोजंदारी कर्मचारी) यांना सेवेत पुन:स्थापित करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना ०२१८ /प्र.क्र.९२/पापु १५

७वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॅाफर्ड मार्केट जवळ
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४००००१
तारीख: ३० ऑगस्ट,२०१८

**वाचा**

१) **मा.कामगार न्यायालय, अकोला येथील तक्रार युएलपी क्र. ५६/१९९५ प्रकरणी पारीत केलेले आदेश दि.२४.०८.२००६**
२) **मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथील रिव्हीजन तक्रार युएलपी क्र. ११०/२००६ प्रकरणी पारीत केलेले आदेश दि.२०.०२.२०१४**
३) **मा.उच्च न्यायालय मुंबई,खंडपीठ नागपूर येथील रिट याचिका क्र. ७७/२०१६ प्रकरणी पारीत केलेले आदेश दि.२०.०२.२०१७**

**प्रस्तावन**

श्री.गजाजन यशवंत केदार हे वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, अकोला येथे दिनांक ०१.११.१९८९ ते ३१.०१.१९९५ पर्यंत रोजंदारीवर कार्यरत होते. त्यांना दि.०१.०२.१९९५ पासून कामावरुन कमी केल्याने त्यांनी मा.कामगार न्यायालय,अकोला येथे तक्रार युएलपी.क्र.५६/१९९५ दाखल केलेली होती.सदर दाव्यामध्ये मा.कामगार न्यायालयाने दि.२४.०८.२००६ रोजी श्री.केदार यांना सेवेत पुन:स्थापित करण्याचे तसेच सेवा सातत्यासह दि.०१.०२.१९९५ ते प्रत्यक्ष पुन:स्थापनेच्या तारखेपर्यंत थकबाकी अदा करण्याविषयी आदेश पारीत केले होते. मा.कामगार न्यायालयाच्या उक्त आदेशाविरुध्द वरिष्ठ भूवैज्ञानिक, अकोला व उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती विभाग यांनी मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथे रिव्हिजन युएलपी.क्र.११०/२००६ दाखल केली होती. सदर अर्ज मा.औद्योगिक न्यायालयाने दि.२०.०२.२०१४ रोजीच्या आदेशान्वये अंशत: मान्य केला. याद्वारे मा.औद्योगिक न्यायालयाने मा.कामगार न्यायालयाने श्री.केदार यांना सेवासातत्यासह पूर्वीच्या पदावर घेण्याबाबत दिलेल्या आदेशात बदल केला नाही ; तथापि पूर्वीच्या मजुरीची थकबाकी अमान्य केली. मा.औद्योगिक न्यायालयाच्या उक्त आदेशाविरोधात शासनामार्फत मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.७७/२०१६ दाखल करण्यात आलेली होती. सदर रिट याचिका मा.उच्च न्यायालयाने दि.२०.०२.२०१७ रोजीच्या आदेशाद्वारे खारीज करुन निकाली काढली आहे. शासनामार्फत दाखल केलेली रिट याचिका मा.उच्च न्यायालयाने खारीज केल्याने मा.औद्योगिक न्यायालय, अकोला यांचे रिव्हिजन तक्रार युएलपी क्र.११०/२००६ प्रकरणी पारीत केलेले दि.२०.०२.२०१४ रोजीचे आदेश कायम झाले आहेत. यास्तव मा.औद्योगिक न्यायालयाच्या दि.२०.०२.२०१४ च्या आदेशानुसार श्री.गजानन यशवंत केदार, रोजंदारी कर्मचारी यांना सेवेत पुन:स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

श्री.गजानन यशवंत केदार, रोजंदारी कर्मचारी, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अकोला यांना मा.औद्योगिक न्यायालय, अकोला यांनी रिव्हीजन तक्रार युएलपी क्र.११०/२००६ प्रकरणी पारीत केलेल्या दि.२०.०२.२०१४ च्या आदेशानुसार सेवेत दि.०१.०२.१९९५ पासुन सेवासातत्यासह पुन:स्थापित करण्यात येत आहे.

श्री.गजानन यशवंत केदार यांना मा.औद्योगिक न्यायालयाचे दि.२०.०२.२०१४ च्या आदेशानुसार कोणतीही थकबाकी/मजुरी अनुज्ञेय होणार नाही. तसेच नियमित शासकीय कर्मचा-याचे कोणतेही लाभ श्री.केदार यांना लागू होणार नाहीत.

सदर शासन निर्णय हा सामान्य प्रशासन विभागाचे अनौपचारीक संदर्भ.क्र.७२४/का १२, दि.१८.०६.२०१८ व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ.क्र.१९०/व्यय-३, दि.१२.०७.२०१८ च्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३०१४३९१७०२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, serialNumber=14841ecd32c757d5bdc1bc806fcf798e88e12bf053f8b2c43a5b1825ab9eb880, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2018.08.30 17:11:15 +05'30'

**(महेश सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन शिवाजी नगर,पुणे
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२, महाराष्ट्र , मुंबई व नागपूर
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती विभाग, अमरावती.
५. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अकोला.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
७. निवडनस्ती, पापु-१५